**कुत्र्यामुळे निर्माण होणाऱ्या वाढत्या समस्यांकरिता राज्यस्तरीय देखरेख समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-२०१६/प्र.क्र.२७५/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०२ मार्च, २०१७

**वाचा :-** (१) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक याचिका २०१६/प्र.क्र.२७५/नवि-२०, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६

(२) पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक व्हीईट/कायदे/१५/१३८३/ २०१६/ पसं-१२,औंध,पुणे-७, दिनांक २४ नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावना** :-

मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे याचिका क्र.६९१/२००९ Animal welfare board of India V/s. People for Elimination of Stray Troubles and other दाखल करण्यात आली आहे. सदर याचिकेच्या दि.१८.११.२०१५ व दि.०९.०३.२०१६ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी मा.न्यायालयाने दिलेल्या निदेशानुसार ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडिया, केंद्र शासन यांनी शपथ पत्र दाखल केले आहे. सदर शपथपत्रात त्यांनी नमूद केल्याप्रमाणे कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवण्यासाठी, रेबीज निर्मुलनासाठी आणि मनुष्य-कुत्रा संघर्ष टाळण्यासाठी दिनांक ११ ऑगस्ट, २०१६ अन्वये राज्यस्तरीय देखरेख समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीच्या सदस्य म्हणून ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडियाने शिफारस केलेल्या प्रतिनिधीची नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवण्यासाठी, रेबीज निर्मुलनासाठी आणि मनुष्य-कुत्रा संघर्ष टाळण्यासाठी गठित करण्यात आलेल्या राज्यस्तरीय देखरेख समितीवर ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडियाने शिफारस केलेले प्रतिनिधी म्हणून शिफारस केलेल्या डॉ.शिरीष पुणतांबेकर, २८ नागाळा पार्क, कोल्हापूर, सदस्य-जीवदया, जीवरक्षा तथा अत्याचार प्रतिबंधक संस्था, १७८९ ई, आर्चीज गॅलरी जवळ, राजारामपुरी ३ री गल्ली, कोल्हापूर - ४१३ ००८ यांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०२१७३०२३४२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.02 17:32:44 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) प्रधान सचिव (पशुसंवर्धन), कृषी, पशुसंर्वधन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, गो.ते.रूग्णालय आवार, १० वा मजला, मुंबई
९) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
१०) सचिव, ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडिया, चैन्नई (पत्राने)
११) ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडियाचे प्रतिनिधी
१२) राज्य ॲनिमल वेल्फेअर बोर्ड ऑफ इंडियाचे प्रतिनिधी
१३) डॉ.शिरीष पुणतांबेकर, २८, नागाळा पार्क, कोल्हापूर, सदस्य-जीवदया, जीवरक्षा तथा अत्याचार प्रतिबंधक संस्था, १७८९ ई, आर्चीज गॅलरी जवळ, राजारामपुरी ३ री गल्ली, कोल्हापूर - ४१३ ००८
१४) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१५) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१६) मुख्याधिकारी, नगरपरिषद / नगरपंचायत (सर्व)
१७) उपसंचालक, पशुसंवर्धन विभाग
१८) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
१९) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
२०) मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
२१) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
२२) निवडनस्ती (नवि-२०).